त्याच्या मोबदला त्याच काळजी जुनी मराठी अर्धवट संपादण्यास तेथें गेले होते काय?

रा. शिंदे 'वेगुवि' ह्या शब्दाचें 'वेगोवित्तर' ह्या शब्दाकडे जें नातें लावतात, त्यांत तर मुळींच तथ्य नाहीं. पहिल्याप्रथम 'वेगुवि' हा शब्दच कोंकणींत नाहीं. 'वेगीं', 'बेगीं' किंवा 'बेगीन' म्हणजे लवकर असा एक शब्द आहे; परंतु तो 'वेगोवित्तर' ह्या शब्दापासून झाला असें म्हणण्यापेक्षां, 'वेगेन' ह्या संस्कृत शब्दापासून झाला असें म्हणणें सयुक्तिक नाहीं काय? रा. शिंदे म्हणतात त्याप्रमाणें इ.स. १०४०त सारस्वत ब्राह्मण गोदावरीच्या आसपास मराठ्यांशीं मिळून असूं शकतील. परंतु ते कोंकणांतून तेथें जाणें शक्य नाहीं काय? 'वेगोवित्तर' ह्या शब्दाच्या आधारावर ते महाराष्ट्रांतून कोंकणांत उतरले असा सिद्धांत कां काढावा?

इ.स. १२०६-१२९०च्या दरम्यान सारस्वत ब्राह्मण महाराष्ट्रांतून कोंकणांत उतरले असें रा. शिंदे म्हणतात. परंतु त्यापूर्वी सुमारें तीनशें वर्षें ते उत्तर कोंकणांत दृढमूल झाले होते एवढेंच नव्हे, तर तेथें त्यांनी एक वसाहत स्थापिली होती, व उत्तरशिलाहारांच्या दरबारांत त्यांचें प्राबल्य मोठें होतें हें शिंद्यांना दाखवून दिलें तर? इसवी सनाच्या दहाव्या शतकापासून पुढल्या दोनशें वर्षांतील शिलाहारांचे ताम्रपट व शिलालेख जर ते लक्षपूर्वक वाचतील, तर त्यांत त्यांना, शिलाहारांचे महामात्य, युद्धखात्याचे मंत्री, मुख्य भाण्डारी, दुय्यम भाण्डारी, राजगुरु, ज्योतिषि, महाकवि वगैरे सर्व सारस्वत ब्राह्मणच होते, असें दिसून येईल. न्यायमूर्ति काशीनाथशणै तेलिंग व इतर विद्वानांनी त्यांना 'दाक्षिणात्य' म्हणजे दक्षिणेकडील असें म्हटलें आहे.[१४] आतां ते दक्षिणेंतील कोणत्या प्रदेशांतून आले हें आपण पाहूं. त्यांचा प्रदेश शोधून काढणें फारसें प्रयासाचें काम नाहीं. कारण त्यांचीं उपनांवेंच त्यांच्या प्रदेशाचा शोध लावितात. तीं उपनांवें म्हणजे **पै, पैप्रभु, प्रभु व नायक** हीं होत. गोमन्तकांतील व मलबारांतील सारस्वत ब्राह्मणांत हीं उपनांवें जितकीं विपुल आढळतात तितकीं दक्षिणेंतील दुसऱ्या कोणत्याच ब्राह्मणांत आढळत नाहींत. **पै किंवा पइ, पै प्रभु, पै कामत, पै बुडबुडे, पै आंगले, पै पाळंदीकार (पाणंदीकार), पै काकोडे, पै काणे, पै रायतुरकार, पै धुंकट, पै भले, पै थोंटे, पै लोटलीकार, पै सांबारी इत्यादि उपनांवें तर एकट्या सारस्वत ब्राह्मणांतच आढळतात**, व त्यांचीं गोत्रें वत्स, कौंडिन्य, अत्रि, भारद्वाज, जामदग्न्य, कौशिक इत्यादि अनेक आहेत. त्यांचे कुलदेव रामनाथ, म्हाळसा, नरसिंह, शान्तादुर्गा इत्यादि आहेत.

दहाव्या शतकाच्या सुमारास गोमंतकाच्या कांहीं भागांत राज्य चालविणाऱ्या

गुहल्लदेव कर्दबाच्या प्रधानमंडळांत पै उपनांवाचेच गोमंतकस्थ ब्राह्मण होते असें गोमंतकांतील सावैवेरें एथील एका अप्रकाशित ताम्रपटावरून कळतें. ह्या ब्राह्मणांचीं नांवें दाम पै, माव पै, महल्ल पै, खल्ल पै, सल्ल पै इत्यादि होतीं.[१५] ह्यावरून उत्तर शिलाहारांच्या दरबारांत असलेले पै वगैरे उपनांवाचे ब्राह्मण गोमंतकांतूनच तिकडे गेले होते ह्यांत संशय राहत नाहीं.

उत्तर कोंकणांतील महासामन्ताधिपति व महामण्डलेश्वर शिलाहार पहिला अपराजित ह्याच्या इ.स. ९९७ च्या ताम्रपटांत जीं अधिकाऱ्यांचीं नांवें दिलीं आहेत तीं सर्व सारस्वत ब्राह्मणांचीं आहेत. **संगलैयपैय** हा अपराजिताचा महामात्य असून त्याचा मुलगा **अन्नप्पैय** हा त्याचा 'प्रतिहस्तक' म्हणजे प्रतिनिधि होता. तसेंच **सीहप्पैय** हा 'महासान्धिविग्रहिक' प्रधान होता.

पहिल्या अपराजिताचा मुलगा अरिकेसरी; ह्याला केशिदेव असेंहि म्हणत. ह्याच्या इ.स. १०१७ वर्षांच्या एका ताम्रपटांत खालील अधिकाऱ्यांचीं नांवें आलीं आहेत. **वासपैय** हा महामात्य असून **वार्धियपैय** हा दुसरा प्रधान होता. अरिकेसरीनें ठाणेंच्या **च्छिंतपैय** ज्योतिष्याचा मुलगा **जामदग्न्य गोत्री** राजगुरु **तिक्कपैय** ह्याला चाविनार गांव इनाम दिला होता. ताम्रपटांत तिक्कपैयचें वर्णन **'यजनयाजनाध्ययनाध्यापनादि षट्कर्मनिरत' 'क्रतुक्रियाकाण्डशौण्ड'** असें दिलें आहे. महाकवि **नागलैय** ह्याचा पुतण्या **जोगपैय** ह्यानें ताम्रपटांतील लेख लिहिला असून, **वेदपैचा** मुलगा **मनधारपैय** यानें तो कोरला, असें म्हटलें आहे.[१६]

अरिकेसरीचा पुतण्या च्छित्तराज ह्याच्या इ.स. १०२६च्या ताम्रपटांत **सीहपैय** हा 'सान्धिविग्रहिक' प्रधान असून, महाकवि **नागलैय** व त्याचा पुतण्या **जोगपैय** हे भाण्डारी होते, असें म्हटलें आहे. ताम्रपटांतील लेख **ज़ोगपैनें** लिहिला होता.[१७]

च्छित्तराजाचा धाकटा भाऊ मुम्मुणि किंवा मामवाणी ह्याच्या इ.स. १०६०च्या शिलालेखांत **सीहपैय**[१८] हा त्याचा महामात्य असून, 'भाण्डागार प्रथमस्थ पाढिसेन' म्हणजे मुख्य भाण्डारी **महादेवैय** होता, असें म्हटलें आहे.[१९] ह्या महादेवैचें उपनांव **प्रभु** होतें.[२०]

मुम्मुणीचा पुतण्या कुंकणचक्रवर्ती अनंतदेव किंवा अनंतपाल. ह्याच्या इ.सन. १०८१च्या विहारच्या शिलालेखांत **रुद्रपैय** हा महामात्य होता, असें म्हटलें आहे.[२१] त्याच्या इ.स. १०९४च्या ताम्रपटांत 'भाण्डागारे प्रथमस्थे पादीसेन' म्हणजे मुख्य भाण्डारी महाप्रधान **महादेवैय प्रभु** व 'द्वितीयस्थे पादीसेन' म्हणजे दुय्यम भाण्डारी प्रधान **सोमणैय प्रभु** होता, असें म्हटलें आहे.[२२]

अनंतदेवाचा मुलगा दुसरा अपराजित ह्याच्या इ.स. ११२७ च्या ताम्रपटांत

**लक्ष्मण नायक** हा महामात्य, **लक्ष्मणैय प्रभु** हा 'महासान्धिविग्रहिक श्रीकरणे भाण्डागारे प्रथमस्थे पाटी महाप्रधान' व **च्छितमैय प्रभु** हा 'द्वितीयस्थे पाटी प्रधान' होता, असें म्हटलें आहे.[२३]

मल्लिकार्जुन शिलाहाराच्या इ.स. ११६०च्या वसईच्या शिलालेखांत **प्रभाकर नायक** आणि **अनंत पै प्रभु** हे त्याचे प्रधान होते, असे म्हटलें आहे.[२४]

शिलाहार महाराजाधिराज कोंकणचक्रवर्ती अपरादित्यदेव ह्याचे इ.स. ११८७ वर्षाचे दोन शिलालेख आहेत. त्यांतील एकांत, **भास्कर नायकाचा** मुलगा **लक्ष्मण नायक** हा त्याचा महामात्य होता, असें म्हटलें आहे.[२५] दुसऱ्या परळच्या शिलालेखांत **अनंत पै प्रभु** हा 'श्रीकरणे भाण्डागारे च प्रथमस्थे पाढी महासान्धिविग्रहिक' प्रधान होता, असें म्हटलें आहे.[२६]

वरील सर्व पुरावे, दहाव्या शतकांत उत्तर कोंकणांत सारस्वत ब्राह्मण दृढमूल झाले होते, हें सिद्ध करण्यास पुरेसे आहेत. आतां, त्यांनी तेथें **वसाहत** कोणती स्थापिली होती, ती पाहूं.

**साष्टी** बेटाचें नांव वरती आलेंच आहे. ह्या बेटाला शिलाहारांच्या लेखांत **'षट्षष्टी'** असें म्हटलें आहे. हा शब्द पहिल्याप्रथम च्छित्तराजाच्या इ.स.१०२६च्या ताम्रपटांत आपणांस आढळतो.[२७] त्याच्यापूर्वी, इ. सनाच्या आरंभापासून सुमारें दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत, तेथील जगद्विख्यात बौद्धविहारावरून, कण्हगिरि,[२८] कण्हसेल[२९] व कृष्णगिरि[३०] ह्या नांवानें तें बेट प्रसिद्ध होतें. ह्या हजार वर्षांच्या काळांत त्याचें 'षट्षष्टी' किंवा 'साष्ट' हें नांव कोणत्याच लेखांत आढळत नाहीं. तेव्हां हें नांव त्यास अकराव्या शतकांत एकदम कसें प्राप्त झालें, ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. षट्षष्टी म्हणजे सहासष्ट किंवा सासष्ट. सासष्ट गांव असलेलें बेट म्हणून साष्ट अशी त्याची व्याख्या. परंतु ह्या बेटांत फक्त ६६ गांव नसून ८६ गांव आहेत. असें असतां, त्याला 'षट्पष्टी' किंवा 'साष्टी' असें नांव पडण्याचें कारण काय असावें बरें? साष्टीच्या आसपास खुद्द ठाणें जिल्ह्यांत किंवा जवळच्या कुलाबा जिल्ह्यांत पाहिलें तर, थोड्या थोड्या गांवांचे समुदाय बनवून त्यांच्या महालांना संख्यावाचक नांवें देण्याची चाल तेथें दिसत नाहीं. ही चाल फक्त आमच्या गोमन्तकांत व आसपास दिसून येते. तेथें तीस गांवांचा समुदाय म्हणून **तीसवाडी**, सासष्ट गांवांचा समुदाय म्हणून **साष्ट**, सत्तर गांवांचा समुदाय म्हणून **सतर**, बारा देसकतींचा समुदाय म्हणून **बारदेस**, आठ अग्राहारांचा समुदाय म्हणून **अष्टाग्रहार**, पांच महालांचा समुदाय म्हणून **पंचम्हाल** अशीं नांवें आहेत. अशा प्रकारचें साष्टीखेरीज एकही नांव ठाणें किंवा कुलाबा

जिल्ह्यांत दिसत नाहीं. ह्यावरून, दहाव्या शतकाच्या सुमारास, साष्ट हें नांव गोमन्तकांतूनच उत्तर कोंकणांत गेलें असावें, व तें कोणी तरी सारस्वत ब्राह्मणानें नेलें असावें, असें मानण्यास हरकत नाहीं. हा ब्राह्मण बहुधा गोमंतकांतील साष्ट महालांतील असावा असें दिसतें. साष्टी बेटांतील व आसपासचीं कांहीं कांहीं गांवांचीं नांवें देखील गोमन्तकीय आहेत. उदाहरणार्थ मूळगांव, राय, शिरगांव, दोंगरी, आंबेली, जुवें, साळगांव, पाली, आगशी, कांदोळी, कोलवें, सोनावळी, वगैरे. ह्यांतील आंबेली, कांदोळी आणि जुवें हीं नांवें किंचित् बदलून अनुक्रमें आंबिवली, कांदिवली व जुहू अशीं उच्चारण्याचा प्रघात पडला आहे. गोमन्तक सोडून उत्तर कोंकणांत गेल्यावर आपणांस आपल्या जन्मभूमीचा विसर पडूं नये म्हणून शेंकडों वर्षे नांवाजलेल्या कृष्णगिरीला **षट्षष्टी किंवा साष्ट** हें नांव देऊन, गोमन्तकस्थ सारस्वत ब्राह्मणांनी आपली देशभक्ति अजरामर करून ठेवलेली पाहून मोठा अभिमान वाटतो, व त्यांच्या देशभक्तीचें तेज खरोखरच अप्रतिम आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. प्रत्यक्ष राज्यकर्त्या उत्तर शिलाहारांनी आपला पूर्वज पहिला कपर्दि ह्याचें नांव चिरस्मरणीय करण्याकरितां त्याच कृष्णगिरी बेटाला **कापर्दिक द्वीप किंवा कवडीद्वीप** असें नांव दिलें होतें; परंतु तें न टिकतां **सारस्वत ब्राह्मणांनीं दिलेलें साष्ट** हें नांवच अझूनपर्यंत अढळ राहिलें आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. शिलाहारांच्या ताब्यांतील वसई, कल्याण, चेऊल ह्या शहरांनाही पेशवे व मुसलमान ह्यांनी आपापल्या ताब्यांतील वसई, कल्याण, चेऊल ह्या शहरांनाही पेशवे व मुसलमान ह्यांनी आपापल्या अमदानींत अनुक्रमें बाजीपुर, इस्लामाबाद व मूर्तिजाबाद हीं नवीं नांवें ठेविलीं होतीं; परंतु तीं थोडक्याच काळांत विस्मृतीच्या पोटांत गडप झालीं. ह्यावरून साष्ट ह्या नांवाची व तें ठेवणाऱ्या देशभक्तांची पुण्याई मोठी प्रखर होती असें म्हणावें लागतें. ह्या प्रसंगीं, हजार वर्षांपूर्वीच्या गोमन्तकस्थांनीं उत्तर कोंकणांत स्थापिलेल्या **बृहद्गोमन्तकाचें** स्मरण आतांच्या व पुढील गोमन्तकस्थांस करून देऊन त्यांच्याकडून मोठमोठीं साहसाचीं व लौकिकाचीं कामें घडवून आणण्यासाठीं **साष्ट हें नांव 'यावच्चंद्रदिवाकरौ' टिको** अशी आशा प्रदर्शित केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.[३१]

वरील विवेचनावरून, सारस्वत ब्राह्मण दक्षिण कोंकणांतच नव्हे, तर उत्तर कोंकणांतही दहाव्या शतकांत संपन्न स्थितींत होते, हें शिलालेख व ताम्रशासनें ह्यांच्या पूर्ण विश्वसनीय आधारावरून सिद्ध होतें.

साष्टीच्या बौद्ध विहारांतील लेख जरा चौकस बुद्धीनें वाचिले असतां, **कोंकणांत सारस्वत ब्राह्मण चवथ्या पांचव्या शतकांतही होते**, हें सिद्ध करून दाखवितां

येतें. त्या विहारांतील दुसऱ्या नंबरच्या लेण्याच्या मागच्या बाजूस बुद्धाच्या उभ्या मूर्तीच्या खालीं एक लहानसा जुना लेख आहे; त्यांत तेथें दर्शनास गेलेल्या कांहीं ब्राह्मणांचीं नांवें दिलीं आहेत; त्यांतील **चेल्लदेव** व **बोप्पइ** हीं दोन नांवें [३२] चवथ्या शतकांतील गोमन्तकस्थ ब्राह्मणांचीं असावीत असें वाटतें. गोमन्तकांत सांप्रत **चलेबाब** हें नांव बरेंच प्रचारांत आहे. 'चलो' व 'चली' हे दोन शब्द सारस्वत ब्राह्मणांतील अनुक्रमें मुलगा व मुलगी यांचे वाचक आहेत. ह्यांचीं प्राचीन रुपें अनुक्रमें 'चेल्लो' व 'चेल्ली' अशीं होतीं. सोळाव्या शतकांत बाटाबाटीच्या काळीं गोमन्तकांतून जे ब्राह्मण मलबारांत गेले ते अझूनही तीं प्राचीन रूपेंच वापरतात. त्यांच्यांत 'चेल्ली चिन्हा, दोळे कुड्डे' म्हणजे 'मुलगी देखणी परंतु डोळ्यांनीं अंध' अशी एक म्हण आहे. ह्यावरून, आतांच्या 'चलो' आणि 'चली' ह्या शब्दांच्या ऐवजीं सोळाव्या शतकांत गोमन्तकांत 'चेल्लो' आणि 'चेल्ली' हीं प्राचीन रूपें प्रचारांत असावीं असें दिसतें. बंगाली भाषेंतही 'चलो' ह्या कोंकणी शब्दाचा वाचक 'चेले' हा शब्द आहे.[३३] ह्यावरून लेण्यांतील चेल्लदेव हे आतांच्या चलेदेव किंवा चलेबाब ह्याचें प्राचीन रूप आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. दुसरें नांव बोप्पइ किंवा बोप पै. हें तर उघड सारस्वत ब्राह्मणाचेंच दिसतें; म्हणून त्या संबंधानें विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं.

पौराणिक दृष्टीनें पाहिलें असतां, विष्णूचा सहावा अवतार परशुराम ह्यानें उत्तर हिंदुस्तानांतून सारस्वत ब्राह्मण कोंकणांत आणिले असें समजतात. परशुरामाचें अवतारकृत्य त्रेता व द्वापर ह्या दोन्ही युगांत गाजलेलें दिसतें. ह्यावरून सारस्वत ब्राह्मण कोंकणांत आल्यास लक्षावधि वर्षें लोटलीं असावीं असें म्हणावें लागतें. परंतु हल्लींच्या शास्त्रीय पद्धतीनें संशोधन करण्याच्या युगांत पौराणिक सरणी बहुतकरून कोणाला पटणार नाहीं, म्हणून ती सोडून दिलेली बरी. सर रामकृष्णशणै यांच्या मतें इ. सनापूर्वीं सुमारें सातव्या शतकाच्या आरंभानंतर आर्य लोक दक्षिणेंत शिरले.[३४] आणि सारस्वत ब्राह्मण तर, वर सिद्ध करून दाखविल्याप्रमाणें, इ. सनाच्या ४ थ्या शतकांत म्हणजे आर्यांच्या आगमनकालाच्या पहिल्या सहस्रकांत कोंकणांत असलेले दिसतात. ह्यावरून ते तेथें बऱ्याच काळापूर्वीं आले असले पाहिजेत ह्यांत संशय नाहीं. मग त्यांना **उपरी** हा शब्द लावणें रास्त आहे काय?

वरील एकंदर विवेचनावरून, **सारस्वत ब्राह्मण हे कोंकणांत उपरी नसून त्यांना लागू केलेली कोंकणी भाषाही उपरी नाहीं**, हें सहज सिद्ध होतें.

दुसऱ्या कलमांत रा. शिंदे म्हणतात कीं, कोंकणीचीं लहान लहान व्याकरणेंही एक दोन शतकांतलींच आहेत. परंतु हें खरें नाहीं. हिंदुस्तानांतील कोणत्याही देशी

भाषेचें व्याकरण होण्यापूर्वी, सुमारें सोळाव्या शतकाच्या अखेरीस, इंग्रज जेजुइत कवि पाद्रि थॉमस स्टिफन्स यानें पुर्तुगेज भाषेंत कोंकणी भाषेचें एक उत्तम व्याकरण रचिलें आहे.[३५]

२४ व्या कलमांत रा. शिंदे ह्यांनीं दहा कोंकणी म्हणी दिल्या आहेत; त्यांत जागोजाग पुष्कळ प्रमाद घडले आहेत. परंतु ह्याबद्दल त्यांना दोष देणें योग्य नाहीं. कारण त्यांची मायभाषा कोंकणी नसून ती शिकण्याचाही त्यांनीं कधींच प्रयत्न केलेला नाहीं. त्यांच्या एखाद्या स्नेह्यानें त्या म्हणी त्यांना रोमन लिपींत अशुद्ध रीतीनें लिहून दिल्या असतील, व रा. शिंद्यांनी त्यांना आपल्या कल्पनेनें देवनागरी पेहेराव चढविला असेल; तेव्हां प्रमाद होणें साहजिकच आहे.

मुंबईचे रावसाहेब डॉ. चव्हाण हे डॉ. दाल्गादांच्या पुर्तुगेज ग्रंथांतील विचारांचा इंग्रजींत प्रसार करीत आहेत असें रा. शिंदे चवथ्या कलमांत म्हणतात. परंतु ह्या विधानांत सत्यांश नाहीं. डॉ. चव्हाणांना डॉ. दाल्गादांचें नांव रा. शिंदे यांच्या 'विविधज्ञानविस्तारा'तील लेखावरूनच पहिल्यानें माहित झालें आहे. ह्यावरून कोंकणीसंबंधानें त्यांनी जे कांहीं विचार प्रगट केले आहेत ते त्यांचे स्वत:चे असून त्यांची जबाबदारी त्यांच्यावरच आहे ह्याबद्दल संशय राहत नाहीं.

तिसऱ्या कलमांत रा. शिंदे म्हणतात कीं, सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीं डॉ. दाल्गाद यांनीं कोंकणी म्हणींचा एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथाचें नांव काय तें त्यांनी दिलें असतें तर बरें झालें असतें. रावसाहेब चव्हाण यांनीं चालू वर्षाच्या आरंभीं, मुंबईच्या आन्थ्रॉपॉलॉजिकल सोसायटीच्या विद्यमानें कोंकणी लोककथा व म्हणी ह्या विषयावर कांहीं व्याख्यानें दिलीं. त्या वेळीं त्यांची जुळवाजुळव करण्यास त्यांस बरेच प्रयास पडले हें मला माहित आहे. कोंकणी म्हणींचें एखादें पुस्तक असल्यास तें मिळविण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला; परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. शेवटीं गोमन्तकापासून मलबारपर्यंत कित्येक स्नेह्यांच्या मदतीनें त्यांनीं सात आठशें म्हणी गोळा करून त्यांच्यावर अत्यंत उपयुक्त विवेचन केलें. डॉ. दाल्गाद यांचा म्हणींसंबंधाचा एखादा ग्रंथ उपलब्ध असता तर तो त्यांना मिळाल्यावांचून राहिला नसता.[३६]

१३ व १४ कलमांत रा. शिंदे सांगतात कीं, 'कोंकणी भाषेच्या शब्दकोशांत मराठीशिवाय इतर स्वदेशी, परदेशी, प्रचलित आणि मृत इत्यादि अनेक भाषांतील शब्दांची भेसळ मराठींतल्यापेक्षांही फार झाली आहे.' तसेंच, 'खुद्द मराठीचा जसा कानडीशीं निकट संबंध आहे, तसा शब्दकोशाच्या दृष्टीनें तरी किंबहुना जास्तच कोंकणीचाही कानडी, तुळू, मल्याळी इत्यादि भोंवतालच्या द्राविडी भाषांशीं संबंध

आणि ऋणानुबंध खास आहे.' ह्या विधानांबद्दल मतभेद असण्याचें कांहीं कारण नाहीं. जगांत जेवढ्या म्हणून भाषा प्रचलित आहेत त्यांच्या जिवंतपणाचें एक लक्षण म्हटलें म्हणजे आसपासच्या भाषांशीं स्नेहसंबंध असणें हें होय. मानवी व्यवहारांत ज्याप्रमाणें परस्परांशीं रोटी-बेटी संबंध ठेवल्यावांचून वंश टिकत नाहींत व वाढत नाहींत त्याप्रमाणेंच परस्परांतील शब्द दिल्या-घेतल्यावांचून भाषाहि टिकत नाहींत व वाढत नाहींत. जगांतील कोणतीच भाषा ह्या नियमाला अपवाद असेल असें वाटत नाहीं. म्हणून, कोंकणी बोलणारांनीं आपल्या भाषेंत परकी शब्द आहेत म्हणून विषाद मानण्याचें मुळींच कारण नाहीं. इंग्रजी भाषेंत पृथ्वीवरील प्रत्येक भागांतील परकी शब्द जेवढे असतील तेवढे इतर कोणत्याच भाषेंत नसतील. परंतु तेवढ्यावरून इंग्रजी भाषेला कमीपणा येतो असें कोणीच इंग्रज माणूस समजत नाहीं; उलट ते आपल्या भाषेचा गौरवच करतात.

१५ पासून १८ कलमांत रा. शिंदे, कोंकणी व मराठी ह्या दोन्ही भाषांतील धातुसाधितें, विभक्ति व काळ ह्यांचे प्रत्यय देऊन त्यांतील साम्य दाखवितात, व 'व्याकरणाच्या समान रूपांवरून कोंकणी ही मराठीपासून भिन्न व स्वतंत्र नाहीं' असें १९ व २१ कलमांत सांगतात. विभक्तींच्या प्रत्ययांचें साम्य दाखवितांना ते म्हणतात, 'बहुतेक सर्व विभक्तींचे प्रत्यय दुसऱ्या कोणत्याही भाषांशीं जुळते नसून मराठीशींच जुळतात, ह्यावरून सारस्वतांनीं दक्षिणेंत आल्यावरच ही भाषा घेतली असेंही होतें.'

दक्षिणेंत सारस्वत ब्राह्मण पहिल्यानें आले कीं मराठे पहिल्यानें आले, हा मुद्दा ज्या अर्थीं वादग्रस्त आहे, त्या अर्थीं दक्षिणेंत आल्यावर सारस्वतांनी मराठ्यांची भाषा घेतली व तिला कोंकणी केली, ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. केवळ वादासाठींच वाद घालावयाचा असेल, तर अनुकूळ निकाल सारस्वत ब्राह्मणांच्याच तर्फेने लावण्यास पौराणिक वाङ्मयाची पूर्ण तयारी आहे हें दाखवितां येईल. विंध्य पर्वताला 'आणखी उंच वाढूं नकोस' म्हणून सांगून दक्षिणेंत पहिल्यानें पाऊल ठेवणारा व इतर आर्यांस तो मार्ग दाखविणारा धाडसी पुरुष म्हणजे **अगस्त्य ब्राह्मण** होता, हें रामायण-महाभारत वाचणाऱ्या सर्व लोकांस माहित आहेच.[३७] हा ब्राह्मण उत्तर हिंदुस्तानांतील असल्यामुळें पंचगौडांतर्गत होता ह्याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. दक्षिणेंतील गौड सर्व सारस्वतच आहेत. ह्यावरून त्यांचा पूर्वज अगस्त्य हाही सारस्वतच असावा. ह्या विचारसरणीनें मराठी आर्यांना दंडकारण्याची वाट दाखविणारे सारस्वत ब्राह्मणच ठरतात, व **दक्षिणेंत मराठ्यांच्या पूर्वीं सारस्वत ब्राह्मण आले होते हें आपोआप सिद्ध होतें**. परंतु हें सिद्ध करण्याला पौराणिक

कथांवरच सगळी भिस्त ठेवण्याचें कारण नाहीं. अलीकडील सर्वमान्य शास्त्रीय पद्धतीनेंही हा मुद्दा सिद्ध करतां येण्यासारखा आहे. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकापासून जे अगदीं प्राचीन शिलालेख कोंकणांतील व महाराष्ट्रांतील बौद्धविहारांत आढळतात, त्यांतील पुष्कळसे शब्द व त्यांचीं रूपें लक्षपूर्वक तपासून पाहिलीं असतां त्यांचा सारस्वतांच्या भाषेशीं जेवढा निकट संबंध दिसतो, तेवढा मराठ्यांच्या भाषेशीं दिसत नाहीं, हें दाखवून देतां येईल. उदाहरणार्थ खालीं दिलेले शब्द पहा :-

ASWI., vol. 4 :

| शिलालेखाचें स्थळ | कोंकणी भाषेशीं निकट संबंध दाखविणारे शब्द | पृष्ठांक |
|---|---|---|
| पितळखोरें | थबो = खांबो. पुतान = पुतांचें. | ८३ |
| ,, | राजवेजस = राजवैजाचें | ८४ |
| बेडसें | नासिकतो = नासकाथावन. सेठिस = सेटीचो. पुतस = पुताचें. | ८९ |
| कार्लें | वेजयंतितो = वैजयंतीथावन | ९० |
| ,, | उसभदातेन = उसभदातान | १०१ |
| ,, | मामालेहारे = मामालाहार[३८] | ११ |
| नासिक | नाळीगेर = नाल्ल | ९९ |
| ,, | दो = दोन. वर्से = वर्सां. चिवरिक = चीर = कापड.<br>मूले = मोल. कोलिक = कोळी. पनरस = पंद्रस<br>सत्तरि = सत्तर. | १०२ |
| नासिक | ओवरको = होंवरी. चोथे = चौथ्या. | १०३ |
| ,, | खेतम = शेत. | १०४ |
| नासिक | गोतमीपुतस = गोतमी पुताचो. गामो = गांव. न वसति = वसना.<br>सीमे = सिमेंत, शिंवेंत | १०६ |
| ,, | वासिठिपुतस = वासिठीपुताचो | १०७ |
| ,, | एकुनवीसे = योकणिसाव्या. गिम्हाण = गिमाचो. बितीये = बिये<br>दिवसे = दिसा. अभयोदकदान = अभय-उदका-दान.<br>सुखदुखस = सुखा-दुखाचें. | १०८ |
| | सातवाहनकुलयस = सातवाहन-कुळा-येस. ठापन = थापप<br>बह्मणस = बामणाचें. अखयम् = अखयें. नखत = नखेत्र. | १०८ |
| ,, | गोवधनाहारे = गोवर्धनाहार. | १११ |

| शिलालेखाचें स्थळ | कोंकणी भाषेशीं निकट संबंध दाखविणारे शब्द | पृष्ठांक |
|---|---|---|
| नासिक | पुतेन = पुतान | ११५ |
| '' | दुहुतुय = धुवेची | ११६ |
| जुन्नर | मटपो = माटव | १०३ |

ASWI., vol. 5 :

| | | |
|---|---|---|
| नानाघांट | दिखा = देख. रायस = रायाचो. गावो = गायो. बारस = बारा हथी = हती. रथो = रथ. गामो = गांव. | ६० |
| '' | पटा = पुडवीं. छवस = स वर्सां | ६१ |
| '' | तेरस = तेरा. तेरस रातो = तेरा रातयो. दस रातो = धा रातयो. | ६१ |
| '' | कुमार = आंकवार, कुंवर | ६४ |
| कण्हेरी | गिह्म = गीम. वाणिजकेहि = वाणयांनी. नातिवगस = नातेवर्ग्यांचें. हितसुखाय = हितासुखाक. हेतु = हेत. नव = नवें. पुतो = पुत. समापिता = सोंपैलें. बोधिकेन = बोधिकान. | ७५ |
| '' | सोपारकाहारे = सुपाऱ्याहार. तेरस = तेरा. | ७६ |
| '' | पोढि = पोंय. पुतस = पुताची | ७८ |
| '' | पख = पाखो; पाखें. हथे = हातांत. खेत = शेत. चिवरिक = चीर = कापड | ७९ |
| '' | आसनपेढिकायो = आसनपेडयो = बांक. | ८० |
| '' | नातिहि = नात्यांनी | ८१ |
| '' | मटपे = माटवांत | ८२ |
| कण्हेरी | अपणो = आपलो | ८४ |
| '' | एक्क = एक. ओवरको = होंवरी. धुतुअ = धुव. णतुकणम् = नातवांचो. नातिणम = नातींचो. पनतुकाणम् = पण्टुवांचो. पनतिणम् = पण्ट्यांचो. सुन्हाणम् = सुनांचो. कुलस्य = कुळाचो. | ८५ |

ASWI., Bombay 1881.

| | | |
|---|---|---|
| महाड | घर = घर. अठ = आठ. | २ |
| कोल | गहपतिपुतस = गहपति-पुताचें. सेठिस = सेटीचें. | ३ |
| कुडें | पुतस = पुताचो. | ४ |
| '' | दुहुतय = धुवेची. | ६ |
| कुडें | वेजस = वैजाचें. | १२ |
| '' | बंह्मनस = बामणाचें. बंमनिय = बामणीचें | १४ |

| शिलालेखाचें स्थळ | कोंकणी भाषेशीं निकट संबंध दाखविणारे शब्द | पृष्ठांक |
|---|---|---|
| '' | उयरको = होंवरी. | १७ |
| भाजें | गाभो = गबो | २३ |
| '' | थुप = तोप | २४ |
| कालें | सिहथभो = शिंव-खांबो | २८ |
| '' | हथि = हती | २९ |
| '' | वेणुवासपुतेण = वेणुवासा-पुतान. | ३० |
| '' | मातुलस = मावळ्याचो. | ३१ |
| '' | दिनिक पुतेन = दिनिका पुतान. सोळस = सोळा. गाम = गांव. गाव = गायो | ३३ |
| '' | सतमे=सातव्या. गिह्म=गीम. पचमे=पांचव्या. दिवसे=दिसा. | ३४. |
| '' | भिखुसं = भिकूचें | ३५ |
| '' | चतुविसे=चोव्वीस. ततिये=तये. बितिये =बिये. मटपो=माटव | ३६ |
| '' | काले = काळार. | ३७ |
| शेलारवाडी | कुडुबिकस = कुंळब्याचें. कुडुबिणिय = कुंळबिणिचें. | ३८ |
| जुन्नर | जणान=जाणांनी. उपठाण=वठाण. लोकहितसुखाय = लोकां-हिंता-सुखाक. | ४२ |
| '' | अखय = अखया | ४३ |
| जुन्नर | पनरस = पंद्रस | ४४ |
| '' | विस = वीस. वडमुले = वडा मुळा. नव = णव. | ४५ |
| '' | आबि = आंबो. पाउनदुके = पावणेदोन. कासकार = कांसार. | ४७ |
| '' | बारस = बारा. चतारि = चार. | ४८ |
| '' | नतुनो = नातवाचो | ५० |
| '' | वसे = वर्सा | ५१ |
| अजंटा | वणिजस = वाणयाचें | ६८ |

बौद्धविहारांतील वरील शिलालेखांवरून, दोन हजार वर्षांपूर्वीं, दक्षिणेंत मराठ्यांच्या भाषेपेक्षां सारस्वतांच्या भाषेचा अधिक छाप बसला होता असें दिसून येतें. हा पुरावा, **दक्षिणेंत मराठ्यांच्या पूर्वीं सारस्वत ब्राह्मण आले होते**, हें सिद्ध करण्यास पुरेसा आहे.

सोळाव्या कलमांत तृतीया विभक्तीचें साम्य दाखवितांना, मराठींत कोंकणीप्रमाणेंच **'रामानं'** असें रूप होतें असें रा. शिंदे म्हणतात. परंतु तें खरें नाहीं.

कोंकणींत **'रामान'** असें रूप होतें व तें बौद्धविहारांतील 'वेणुवासपुतेण' 'दिनिकपुतेन' 'उसभदातेन' 'बोधिकेन' अशा तऱ्हेचें आहे. तें संस्कृतांतील अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दांच्या तृतीयेच्या एकवचनी रूपाला धरून आहे. मराठींत बोलण्यांत 'रामानें' ह्या ऐवजीं 'रामानं' असें म्हणतात ती एक **बोलण्याची ऐट** आहे. 'केलें,' 'गेलें' हे शब्दही मराठींत 'केलं,' 'गेलं' असेच उच्चारतात; परंतु बोलण्याच्या ऐटीपलीकडे त्यांत तृतीयेच्या 'न' प्रत्ययाचा बोध होत नाहीं.

कोंकणी भाषेचें मराठीशीं अभिन्नत्व दाखविण्यासाठीं रा. शिंद्यांनीं जे धातुसाधितांचे व विभक्तींचे प्रत्यय दिले आहेत त्यांतही बरेच प्रमाद घडले आहेत; ते दुरुस्त करण्याच्या भरीस न पडतां, शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं, रा. शिंदे यांनीं कोंकणी व मराठी ह्यांतील कित्येक साम्यें दाखवून त्या दोन्ही भाषा परस्परांपासून भिन्न व स्वतंत्र नाहींत असें सांगण्याचा कितीही अट्टाहास केला, तरी त्यांची मायभाषा मराठी असूनही ज्या **अर्थी कोंकणी भाषा त्यांना बोलतां येत नाहीं व बोललेली नीट समजत नाहीं, त्या अर्थी ती मराठीपासून भिन्न आहे हें कबूल करणें त्यांना भाग आहे**. रा. रा. चिंतामण वि. वैद्य हे कोंकणी भाषेला बुध्द्याच मराठी नांव देऊन म्हणतात कीं, '**गोवें प्रांतांतील लोकांची मराठी भाषा तर एक निराळ्या तऱ्हेचीच मराठी भाषा वाटते.**'[३९] ह्यावरून कोंकणी भाषेला कोणतेंही नांव ठेविलें तरी **मराठीपासून ती भिन्न आहे** असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. आम्हां गोमन्तकस्थांना मराठी भाषा जरी साधारणपणें मोडकी-तुटकी लिहितां, वाचतां व बोलतां येते, तरी त्यासाठीं निदान **तीन चार वर्षें आम्हांला तिचा मुद्दाम अभ्यास करावा लागतो**; त्याशिवाय ती आम्हांला येत नाहीं. लिहिण्या-वाचण्याची गोष्ट राहूंद्याच; परंतु **बोलायला सुद्धां आम्हांला ती मोठ्या प्रयासानें शिकावी लागते**. इतकेंही असून, मराठ्यांना जशी कोंकणी भाषा शुद्ध बोलतां येत नाहीं तशी आम्हांलाही मराठी भाषा शुद्ध बोलतां येत नाहीं; व ह्याबद्दल मराठ्यांना किंवा आम्हांला विषाद वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. सर रामकृष्णशणै भाण्डारकार हे जगन्मान्य विद्वान् पंडित जरी स्वत:ला मराठे म्हणवीत, व त्यांचा मराठीचा व्यासंग दांडगा असे, तरी ते देखील **मूळचे अस्सल कोंकणी** असल्यामुळें त्यांचे मराठी उच्चार कोंकणीच्या धर्तीवर जात, असें मी त्यांच्या एका मृत्युलेखांत वाचलें आहे. न्यायमूर्ति सर नारायणशणै चंदावरकार हे विद्वान् कोंकणी गृहस्थ मोठे अप्रतिम वक्ते खरे; तरी एखाद्याही प्रसंगीं त्यांना मराठींत भाषण करतां येत नसे, ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

मराठी व कोंकणी ह्या भाषा केवळ अभिन्न आहेत म्हणून कोंकणीचा त्याग

करून मराठीलाच मस्तकावर घेऊन नाचावें असा कोणी कितीही आग्रह व उपदेश केला, तरी कोंकणी लोकांनी व विशेषत: गोमन्तकस्थांनी त्याकडे लक्ष देण्याचें मुळींच कारण नाहीं. मराठी व कोंकणी ह्यांमध्यें जेवढें साम्य आहेसें दिसतें, त्यापेक्षा किती तरी पटीनें अधिक साम्य युरोपांतील लॅटिन भाषांमध्यें आहे. उदाहरणार्थ, सांप्रतच्या पुर्तुगेज, स्पॅनिश व इटालियन ह्या तीन भाषाच आपण घेऊं. ह्यांत स्पॅनिश भाषेंतील एक वाक्य पुढें दिल्याप्रमाणें आहे : -

'Un invalido imaginario, que vivia en una gran plaza de Londres, fue' ordenado por su medico de dar una vuelta al rededor de la plaza, todas las mananas antes de almorzar.'

ह्या वाक्याचें पुर्तुगेज भाषांतर :-

'Um invalido imaginario, que vivia em uma grande praça de Londres foi ordenado por seu medico a dar uma volta ao redor da praça, todas as manhãas antes de almoçar.'

मराठी अर्थ : -

'लंडनच्या एका मोठ्या चौकांत राहणाऱ्या एका भ्रमिष्ट रोग्याला त्याच्या वैद्यानें रोज सकाळीं न्याहारीच्या पूर्वी चौकाच्या सभोंवतीं एक चक्कर मारण्यास सांगितलें.'

आतां इटालियन भाषेंतील एक वाक्य घेऊं, तें असें :-

'Un giovine indusse la figlia d'un ricco negoziante di Londra a fuggire con esso lui in Iscozia.'

ह्या वाक्याचें पुर्तुगेज भाषांतर :-

'Um joven induziu a filha d'um rico negociante de Londres a fugir com elle em Escocia.'

मराठी अर्थ :-

'एका तरुणानें लंडन येथील एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलीचें मन, आपल्याबरोबर स्कॉटलंडमध्यें पळून जाण्यासाठीं वळविलें.'

वरील वाक्यांवरून पुर्तुगेज,स्पॅनिश व इटालियन ह्या तीन भाषांत केवढें साम्य आहे त्याविषयीं वाचकांची खात्री होईलच. तथापि एवढें साम्य असूनही, तीं तीनही राष्ट्रें आपापल्या मायभाषा परस्परांपासून भिन्न समजतात व त्यांत त्यांनी परस्परांपासून स्वतंत्र असें जगन्मान्य वाङ्मय निर्माण केलें आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. दान्तीची 'दिव्हीन कोमेदिय,' सेर्व्हान्तिसचा 'दों किशोत' आणि कामोंय्यसचें 'लुजीयदस' हे अनुक्रमें इटालियन, स्पॅनिश व पुर्तुगेज ग्रंथ जगाच्य वाङ्मयाचे लोकोत्तर अलंकार नाहींत असें म्हणण्याची कोणाची छाती आहे?

थोडक्यांत सांगावयाचें एवढेंच कीं, युरोपियन भाषांचीं उदाहरणें डोळ्यांसमोर कित्त्यांप्रमाणें ठेवून, जात्याच तेजस्वी व बुद्धिमान् गोमन्तकस्थांनीं परक्या भाषांचें फाजील अवडंबर न माजवितां **आपल्या मायभाषेची म्हणजे कोंकणीची** योग्य जोपासना करून तिला जगांतील उत्तमोत्तम भाषांच्या योग्यतेस आणावी अशी माझी त्यांस सविनय विनंती आहे. उत्तम भाषेला लागणारे प्रमुख गुण म्हणजे ऐश्वर्य, सौंदर्य व माधुर्य हे कोंकणी भाषेंत निसर्गतःच भरलेले आहेत हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.[४०]

टिपो :

१. Early Hist. of the Dek., Bambay 1884, p. 93 & note 3.

२. रट्टराज शिलाहाराचा इ.स. १०१०चा दुसरा एक ताम्रपट १९२८च्या जुनांत प्रसिद्ध झाला आहे. तोही **संस्कृतांत** आहे. (The Indian Historical Quarterly, Calcutta, vol. 4, No. 2, pp. 203-20).

३. Ind. Ant. vol. 9, p. 39.

४. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, पैलें खंड, पा. ४०-४१, ८८.

५. राष्ट्रकूट हे गोमंतकांतील साष्ट महालांतील **लोटली** गांवचे असून **अस्सल कोंकणी होते; मराठे नव्हते**. त्यांनीं सवादोनशें वर्षे मराठ्यांचा एकंदर देश आपल्या ताब्यांत ठेवला होता. (गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, पैलें खंड, पा. २८-३८.)

६. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, पैलें खंड, पा. ४१.

७. Ind. Ant. vol. 8, p. 24 I.

८. Ind. Ant. vol. 10, pp. 251-254.

९. Bombay Gaz., vol. 15, pt. 1, p. 117. South Canara Manual by J. Sturrock, I.C.S., Madras 1894, vol. 1, pp. 145-6.

१०. Bombay Gaz., vol. 15, pt. 1, p. 117, note 1.

११. Ind. Ant. vol. 10, p. 250.

१२. रघुवंश, सर्ग ४, रघुदिग्विजय, श्लोक २९-५८

१३. महाभारत, वनपर्व, अ. ११४, श्लो. ३; अ. ११७, श्लो. १८; अ. ११८, श्लो. १, ३, ४, ८, १५.

१४. Ind. Ant. vol. 9, pp. 41 and 46.

१५. विविधज्ञानविस्तार, वर्ष ६१, अं. १, पृ. २५.

१६. Epig. Ind., vol. 3, p. 275.

१७. Asiatic Researches, London 1798, vol. 1, pp. 361-367. ह्या ग्रंथांत ३६७

पृष्ठावर महाकवि नागलैचा पुतण्या Jó-uba असें लिहिलें आहे तें चूक आहे: तें Joga पाहिजे. कारण, अरिकेसरीचा पुतण्या च्छित्तराज ह्याच्या इ.स. १०२६च्या ताम्रपटांत महाकवि नागलैय ह्याचा पुतण्या जोगपैय (भाण्डागारसेन जोगपैयेन भाण्डागारसेन महाकवि श्री नागलैय भ्रातृसुतेन) असें स्पष्ट म्हटलें आहे. (Ind. Ant. vol. 5, pp. 279 and 281.)

१८. Ind. Ant., vol. 5, p.p. 278-281.

१९. पंडित भगवानलाल इंद्रजी ह्यांनीं 'विन्तपैय' असेंही नांव सुचविलें आहे. (JBBRAS., vol. 12, p. 329.)

२०. JBBRAS., vol. 12, p. 330.

२१. Ind. Ant., vol. 9, pp. 35 and 38.

२२. Bom. Gaz., vol. 13, part 2, p. 425, note 6.

२३. Ind. Ant. vol. 9, pp. 35 and 38.

२४. JBBRAS, vol. 21, pp. 509 and 514.

२५. Bom. Gaz., vol. 13, part 2, pp. 426-427, note 4. सूर्याचा प्रकाश सिद्ध करण्यास मेणबत्तीची गरज नाहीं त्याप्रमाणें अनंत पै प्रभु हा गोमंतकस्थ ब्राह्मण होता हें सिद्ध करण्यास बाहेरच्या कोणत्याच आधारांची गरज नाहीं. कारण पै प्रभु हें उपनांवच स्वत:सिद्ध खंबीर आधार आहे. हें उपनांव गोमंतकस्थ ब्राह्मणांखेरीज इतर कोणत्याच ब्राह्मणांमध्यें किंवा ब्राह्मणेतरांमध्यें उपलब्ध नाहीं. असें असतां, मराठी इतिहासकार रा. चिंतामण विनायक वैद्य एम.,ए., एलएल.बी. हे अनंत पै प्रभूला कायस्थ जातीचा करूं पाहतात. परंतु त्याला आधार काय तो ते देत नाहींत. इतिहासकार ह्या नात्यानें सुप्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्ति पाहिजे त्या जातीला वांटून देण्याचा अधिकार आपणास आहे ह्या समजुतीनेंच जणु काय, उदार अंत:करणाने, ते अनंत पै प्रभूचा अहेर कायस्थ जातीला करतात; परंतु हा ब्राह्मण आपणांला कधींच पचणार नाहीं असें विचारवंत कायस्थ जातीला वाटून रा. वैद्यांचा अहेर ते आभारपूर्वक परत करतात ही समाधानाची गोष्ट आहे. रा. वैद्य म्हणतात, 'शिलाहारांच्या लेखांत 'अय्य' उपपदान्त नांवें नेहमीं ब्राह्मणांचींच नसतात. उदाहरणार्थ, खारेपाटण लेखांत 'महादेवय्या प्रभु आणि सोमणय्या प्रभु' अशीं दोन नांवें आली आहेत. हे प्रभु हल्लींच्या कोकण कायस्थ प्रभूंचेच पूर्वज दिसतात. तसेंच अपराजित्याचा इसवी सन ११८७च्या लेखांतील (BBRAS. १२, पा. ३३३) अनंत पै हाहि प्रभू असावा. परंतु हल्लींच्या कायस्थ प्रभूंस ही गोष्ट संमत नाहीं.''* ह्या अवतरणांत रा. वैद्य 'महादेवय्या प्रभू आणि सोमणय्या प्रभु' हेही कायस्थ आहेत म्हणून उदाहरणादाखल देतात; परंतु ते कायस्थ कसे याचा उलगडा ते करीत नाहींत. ते बहुधा W. H. Wathen साहेबांच्या तर्कावर भिस्त ठेवीत असतील. ह्या साहेबांनी 'प्रभु' ह्या शब्दावरून अनंत पै प्रभु व इतर प्रधानांला कायस्थ जातीचें ठरविलें होतें. परंतु सुप्रसिद्ध संस्कृत पंडित न्यायमूर्ति काशीनाथशर्णै तेलिंग यांनीं इ.स. १८८० त अनंतदेव शिलाहाराचा इ.स. १०९४ चा

* मध्ययुगीन भारत, भाग ३रा. पुणें १९२६, पृ. ३७२-३७३.

ताम्रपट संपादतांना वाथेन साहेबांची चूक सप्रमाण खोडून टाकिली आहे. ते म्हणतात, "The names of the grantees and of some of the ministry are also remarkable. They all seem to be southerners. These 'southerners' are also to be noticed in Dr. Buhler's plate, and in the अंबरनाथ inscriptions, as well as in the plate in the Asiatic Researches, and in Dr. Buhler's plate of the राष्ट्रकूट गोविंद III. It is evident, therefore, that the 'Ayya' community occupied a position of considerable influence in those days even at the courts of princes, who were not directly ruling in the south. Upon the name of अनंत पै प्रभु, which occurs in the Parel inscription, Mr. Wathen remarks as follows :- 'It is singular, however, and in support of the pretensions and traditions of the कायस्थ प्रभुs that they seem to have been ministers under this राजा, viz., अपरादित्य. 'I am not quite so sure that प्रभु there does indicate the प्रभु caste, and I do not understand that Mr. Wathen has any other basis for his suggestion. Against it we have to remember that in No. 8 of Mr. Wathen's own Inscriptions, a Brahman is mentioned as bearing the name केशव प्रभु, and there are persons named in our own plates as 'प्रभु s' who do not appear to belong to the प्रभु caste. Even in our own days, प्रभु is a Brahman surname, and I am inclined to interpret the word in the various plates before us as indicating only a surname and not a name of a caste. **The name अनंत पै also seems to indicate that that man was not of the प्रभु caste** but a 'southerner'." (Ind. Ant., vol. 9, p.46.)

२६. Bom. Gaz., vol. 13, part 2, p. 427, note 1.

२७. JBBRAS, vol. 12, pp. 333-335.

२८. Ind. Ant., vol. 5 pp. 278 and 281.

२९. ASWI., vol. 4, नासिक, बलश्रीचें देवीलेण किंवा आकाशयान p. 108.

३०. ASWI., vl. 5, कण्हेरी caves, No. 81 p. 79 & No. 59. p. 84.

३१. Ind. Ant., vol. 13, pp. 134-136.

३२. उत्तर कोंकणांतील साष्टीची वसाहत, तेथें गेलेले गोमंतकस्थ ब्राह्मण व कोंकणी भाषा ह्या विषयींचें विस्तृत विवेचन 'गोंयकारांची गोंयाभायली वसणूक' मुंबै १९२८, पैलें खंड, पा. ४६-५४वर आलें आहे तें पहा.

३३. ASWI., vol. 5, p. 74.

३४. Dr. Bhandarkar's Wilson Philogical Lectures, JBBRAS., vol. 16, p. 258.

३५. Early Hist. of the Dek., p. 8.

३६. परिशिष्ट अ पहा.

३७. डॉ. दाल्गाद यांचा कोंकणी म्हणींचा एक ग्रंथ आहे असें मला अलीकडे समजलें आहे; परंतु तो अझून माझ्या पाहण्यांत आला नाहीं.

३८. रामायण,अरण्यकाण्ड, सर्ग ११, श्लो.८५. महाभारत, वनपर्व, अ.१०४ श्लो.११-१४.

३९. 'आहार' हा शब्द सावंतवाडी संस्थानांत फार प्रचारांत आहे. त्याचा अर्थ कडे, जवळ असा होतो. जसें, रामाहार = रामाकडे, रामाजवळ.

४० मध्ययुगीन भारत, भाग २रा, पृ. २७५.

४१. विविधज्ञानविस्तार, मुंबै सेतेंब्र १९२६, वर्स ५७, आंक ९, पा. ३५३-३६५.

कोंकणी परिशद

तिसरी बसका

१९४२

# येवकार-अध्यक्षांलें अुलोवप

*

१९४५

*

खरेले धर्मशीळ, सत्वशीळ, विनयशीळ
म्हगेले अेकलेच अेकले
जल्माचे वैज
**मानादीक डॉक्टर व्हिक्तीञ्ज पात्रोसीन दे लीम,**
अेल.अेम.ॲण्ड अेस.,
(Dr. Victinho Patrocino de Lima, L.M. & S.)
(असकै, बारदेस, गोंय. जल्मदीस १५ जून १८७८)
हांकां
गुणांक भुलून आनी अुपकारान भारावन
हें म्हगेलें कोंकणी फूल मोट्या
आदरान हांव ओपतां.

- **शणै गोंयबाब.**

## मांडावळ

मांडावळ ... ''
आधारावळ आनी संक्षेप ... ''
शणै वर्दे वालावलीकार - परिशदेंत अुलोवप करतना -
येवकार-अध्यक्षांलें अुलोवप ... ...

(कोंकण्या भावां-भैणींक माये-मोगाचो येवकार. हिंदुस्तानांतल्या हेर लोकां परस कोंकणो नाखा-दोळ्यान वेगळो ना. म्हणटकूच हेरांआदीं ताकाच आमी वेंग कित्याक मारतांत? कोंकणी अुतर आयकनाफुडें आमचे कान फुलतात. हेर भासांनी कित्याक फुलनात? कोंकण्याक कोंकणो, मराठ्याक मराठो आनी कानड्याक कानडी म्हणु वळखपाची कुरू.

आवै -भाशेच्या दरअेका अुतरांत मंजूळ सूर भल्ला.मनीस पैशिल्या परक्या मुलखांत पावतकूच, आवै-भाशेचें अुतर आयकूंक आंवडे गिळटा. साडेचारशीं वर्सांफाटली पुर्तुगेजांली अेक गजाल. कालेकुटच्या बंदरांत पुर्तुगेज अुतरां आयकूंक येनाफुडें, वास्कु गामाचो आनी ताचे वांगडच्यांचो जीव अितलो भुरकुटलो कि तांच्या दोळ्यांतसून खोसयेचीं दुखां व्हांवलीं ! आवै-भाशेचीं अुतरांच न्हयत, तर आपणालो सीमशेजारीय पैशिल्या मुलखांत आपणाक मेळ्ळो जाल्यार जीव कितलो भुरकुट्टा !

पणून ही मुंबै आमकां परकी न्हय. ही आमगेलीच भूंय. हें आमगेलेंच कोंकण. ह्या कोंकणाची वर्णना. केदी भाग्यवंत आनी गिरेस्त ही आमगेली आवै ! ह्या मुंबै शारांत अेका वेळार आमी सगळ्यांच्या माथ्यार आसले. आज आमी सगळ्यां फाटल्यान अुंल्ल्यांत. अुत्तर कोंकणांत आमगेलें स्वराज्य. शिलाहार हे आमगेले निजाचे कोंकणे राजा. ते चाड्डे (चतूरथी) क्षत्रिय. तांगेली जल्म-भूंय आनी अितिहास. दक्षीण कोंकण. अुत्तर कोंकण आनी कोलापूर हांगाचे शिलाहार अेकाच घराण्यांतले. गोंयचे जांबावलेचे. अुत्तर शिलाहारांल्या दिवाणांत दक्षीण कोंकणांतले विद्वान आनी कर्तुत्वी मनीस. मुंबै लागशिली सास्ट गोंयचे सास्टीवैल्यान तांणीच वसैली. बाराव्या शेंकड्यांत मुंबै वाळकेश्वराचें देवूळ तांणीच बांदलें. अठराव्या शेंकड्यांत राम कामतीन तें सरी केलें. हजार वर्सांफाटीं तांगेली सत्ता थैं चलताली म्हणपाचो तो अेक गडगंज पुरावो. वाळकेश्वरच्या म्हादेवान कोंकण्यांलें स्वराज्य तसेंच

तांचेर आयल्लें परराज्य हीं दोनूय पळेल्यांत.

आमगेले परिशदेचो जल्म कारवारा जालो. मोटें भाग्यवंत भुरगें. कारवारच्यान तें अुडपी गेलें आनी थैंच्यान मुंबै आयलें. वचत थैं ताची तोखणाय. **भौ. शानभागांनी** ताची घेतिल्ली जतनाय. ताचे कांय **कंसमामा.** परिशदेचो आनी कोंकणी भाशेचो जीव घेवंक ते वावुरतात. **ते आत्मघातके घरभेदी. तांगेलो नश्टो प्रचार.** १९४१चे गणते वेळार तांणी हाडिल्लीं आडमेळीं. कोंकणीक कोंकणी-मराठी वा मराठिची पोट-भास म्हणचेलो तांगेलो हट. सोलापुरचे मराठी साअित्य परिशदेंत तांणी करून घेतिल्ली अेक थारावणी. कोंकणी ही आतांचे पुस्तकी मराठिचें पोरणें रूप खैं. अशें आसल्यार, **आतांची मराठी ही कोंकणिची साप भंगिल्ली तरा** म्हणूंक जाय.

आमगेले घरभेदी नाचतात आनी अुट्टात ते डॉ. सर भाण्डारकारांल्या नाड्यार. हे पंडीत कोंकणीक 'गोवानीज मराठी' आनी 'कोंकणी मराठी' म्हणटात. हांतूंतलें 'गोवानीज' हें विद्रूप, व्याकरणाभायरें आनी बुरशें अुतर तांगेले विशाळ विद्येक सोबना. खासा तांकांय तें लागू जाता. ते गोंयच्या सास्ट म्हालांतले केळोशीकार बामण. **ते हाडा-मासान 'गोवानीज.'** पुण तांणी गोंयचें तोंड केन्नाच पळोवंक नासलें आनी थैंचे भाशेचो धड अभ्यासूय करूंक नासलो. हाचे पुरावे. तांगेल्यो जायत्यो चुकी. **तांकां कोंकणी भाशे संबंदान मत्त दिवंक फावोसो अधिकार नासलो.** तरी आसतना, 'म्हत्वाच्या जायत्या गजालींत **मुखेल मराठीपासून कोंकणी वेगळी**' हें तांगेलें मत्त ध्यानांत धरूंक जाय. हेंच मत्त डॉ. ग्रियर्सन चड फोडून सांगतात. अशें आसतना, तेय कोंकणीक मराठी म्हणटात ! कारण. कोंकणाची राष्ट्रीक सरस्पत ते मराठी समजतात हो **तांगेलो व्हडलो चुकिचो समज**. कोंकण आनी मराठण मेळून अेक राष्ट्र न्हय. महाभारताच्या वेळापासून **मराठणापासून कोंकण वेगळें** लेखलां. कोंकण गाजतालें तेन्ना महारट्ठ ह्या अुतराचो जल्मूय जावंक नासलो. आमगेलो म्हाल-म्हातारो सह्याद्री कितें म्हणटा?

राष्ट्रीक सरस्पत दों तरांची : तोंडी आनी पुस्तकी. **आमगेली तोंडी सरस्पत** म्हळ्यार लोक-वेद चड पोरणो. तांतूंत काणयो, म्हणण्यो, गितां बी तरेकतरा रुचीक सांटो भल्ला. आजवेर अुजवाडा आयल्ल्यो कोंकणींतल्यो म्हणण्यो. कांय म्हणण्यांवैल्यान काणयो बरोवं येतीत. कांय म्हणण्यो कोंकणाच्या पुर्विल्ल्या अितिहासाचेर अुजवाड घालतीत. कोंक़णींतल्यो अुलोवपा-मोडी. कोंकणिच्या आंगा-खांदावैल्यो ह्यो मोलादीक वस्ती. ह्यो आटोवन तांच्यो

मराठी आनी कानडी वस्ती करूंक मेळच्यो नात. आमगेलो लोकवेद म्हळ्यार रत्नांची खण.

**आमगेली पुस्तकी सरस्पत** सोळाव्या शेंकड्यांत अेवरोपी पाद्रिंनी फुडें काडली. कोंकणी पुस्तकी सरस्पती परस मराठी पुस्तकी सरस्पत फक्त तीनशीं वर्सांनी जाणटी. ह्या साडेचारशीं वर्सांत कोंकणी पुस्तकी सरस्पत कितली वाडली? **व्याकरणां** सुमार १९ जाल्यांत. हिंदुस्तानांतले हेर खैंचेय देसी भाशेच्या व्याकरणा आदीं कोंकणिचें व्याकरण सोळाव्या शेंकड्यांत जालें.अेवरोपी आनी कोंकणे व्याकरणकार. कोंकणिच्यो **अुतरावळी आनी कोशूय** जायते जाल्यात.' कोंकणी **देवाधर्माचीं पुस्तकां**: क्रिस्तांव धर्मासंबंदान सुमार २०० पुस्तकां. क्रिस्तांव संतांल्यो जिणो. हिंदू धर्म, नीत आनी वेदान्त हांचे संबंदाचीं पुस्तकां. **अितिहास, जिणो, निबंद, नवलकाणयो आनी काणयो, खेळ, वैजकी, भास-शास्त्र, भोंवडी, संगीत, नाच, रांदप, जोयशिकी** आनी **भुरग्यांलें मुळावें शिकोवप** हांचे संबंदाचीं पुस्तकां. **कोंकणी वर्तमानपत्रां आनी नेमाळीं. कोंकणी हाताळीं. कोंकणी रंग-भूंय. कवीत.** कोंकणी मांड्यांच्यो रुचीक पती. सुपुल्ल्या भुरग्यांलीं गितां. भुरग्यांले लाडकुबायेचें गीत. आमगेलें वेदान्ती क़वीत. भगवद्गीतेचें सादें-सोपें भाशांतर.

कोंकणी राष्ट्रीक सरस्पतिच्या ह्या पुराव्यांवैल्यान, डॉ. ग्रियर्सनांलेच तर्क-रितीन कोंकणीक मराठिची पोट-भास म्हणुं नज. आमगेली सरस्पत आज जरी ल्हान आसली तरी दिसानदीस वाड्टली. संवसारांतल्या सगळ्या भासांची अशीच गजाल.

ह्या साडेचारशीं वर्सांत ल्हानव्हड ५०० पुस्तकां कोंकणींत जाल्यांत. पुर्तुगेज आनी ब्रिटिश सरकाराचोय आलासरो तिका मेळूंक लागला. धा वर्सांफाटीं पुर्तुगेज सरकारान मुंबै शारांत आपल्या खर्चान कोंकणी साळ घाल्या. पुर्तुगालच्या सरकारानूय कोंकणी साळ अुगडिल्ली. गोंयच्या लोकांकूय भुरग्यांलें मूळ शिकप कोंकणींत जावपाची अुमळशीक लागल्या. सरकाराकडेन तांगेली मागणी. आमगेले मोटेमोटे विद्वान लोकूय कोंकणीक माना-भौमानान पळोवंक लागल्यात. नामनेचे वकील **शामराव विठ्ठल कायकिणी** हांकां कोंकणिचो मोटो अभिमान. 'भिडेस्त रायुबाब' तांकां भौच मानलो. **हट्यंगडी नारायणराव** हेय नामनेचे वकील कोंकणिचे व्हडले अभिमानी. कोंकणींत पत्रां बरोवंक लजतल्यांची तांणी भगल माल्ल्या. कोंकणी संबंदान तांगेली म्हणणी:

**'कोंकणी भास मरूंक ना.' 'कोंकणी भास विसरची न्हय.'** कोंकणी मठांच्या स्वाम्यांचेर हे म्हणणेचो परिणाम. गोंयच्या जायत्या विद्वानांच्या अंतस्कर्णांत कोंकणिचो मोग वियेवंक लागला. आमगेले अेक विद्वान तत्वगिन्यानी कितें म्हणटात? **पंडिता प्रोपेर्सियाबाय** कितें म्हणटात? आतां कोंकणि्चो दिसानदीस जयजयकार जावंक लागला. पुरावे. आतां आमी घरच्या आनी भायल्या विरोध्यांली पर्वा करची गरज ना. तरी आसतना, तांगेली म्हणणी विसकून ती कितली पोली आसा तें दाखोवंक जाय. तांकां चीप बसोवंक जाय.

विरोध्यांली म्हणणी : कोंकणी भाशेक हालीं मेरेन नांवूच नासलें खैं. मराठीक तरी खैं आसलें? संस्कृत भाशेक हजारांनी वर्सां नांवूच नासलें. पोरणे मराठींत आनी आजचे कोंकणींत जायतीं अुतरां सारकीं आसात, देखून कोंकणी ही मराठिची पोट-भास खैं. मराठींत आनी हिंदींत, तशेंच हेर कांय भासांनी सारकीं अुतरां जायतीं भल्ल्यांत. देखून, तांकां अेकामेकांल्यो पोट-भासो म्हळ्यार जायत? भासांतलीं अुतरां सारकीं आसलींय जाल्यार त्यो अेक न्हयत; तांची व्याकरणी बांदावळ सारकी आसल्यारूच त्यो अेक. कोंकणिची आनी मराठिची व्याकरणी बांदावळ सारकीच न्हय. भास-शास्त्री डॉ. सुमित्रबाब कत्रे हांगेलें मत्त : **मराठीपासून कोंकणी वेगळी**. मराठी परस कोंकणी चड पुर्विल्ली. वेदीक आनी संस्कृत भाशेकडेन तिचें चड लागशिल्लें नातें. अुच्चारांत आनी व्याकरणांत मराठी परस कोंकणी वेगळी.

संस्कृतांतसून तद्भव जाल्लीं अुतरां हेर आर्य भासांतल्याय परस कोंकणींत जायतीं. संवसारांतलें पैलें-वैलें अुतर **हांव**. वेदीक आनी संस्कृत **अहम्** कडेन हाचें दाट नातें. मराठींत 'मी' म्हणटात. हाचेवैल्यान मराठिचो पांवडो कोंकणी सकला जायतो लागता. कांय हेर आर्य भासांत आनी कोंकणींत हांव ह्या अुतराचो दाट अेकचार.

हालिंच्या आर्यभासांचें संस्कृत भाशेकडेन कितल्या वांट्यान आनी पांवड्यान नातें लेखता तें पळोवपाचें अेक मुखेल लक्षण. कोंकणी भाशेच्या पालवान वेदांतल्या कांय कठीन अुतरांचोय अर्थ लावंक सोंपें पडत. कोंकणिचें कुळार वेदांच्या कुळवंत, गिरेस्त, नांवादीक आनी लोकीकवंत घराण्यांतलें. देखून आमकां परक्या भासांच्या लोकिकार वांचपाची गरज ना.

आमगेल्या विरोध्यांक कोंकणिची दुस्मानकी आनी बंगाली लोकांक ओडियी भाशेची दुस्मानकी हांचो मेळ.

कोंकणिचे विरोधी म्हणटात कि ती भास अुलैतल्यांलो आंकडो साप ल्हान. तांतूंत पुस्तकां छापप बेठें खर्चाक म्हारग. **खरेली कोंकणी** अुलैतल्यांलो आजचो आंकडो सुमार २५ लक्ष. तिका जमतली बाणकोटी आनी संगमेश्वरी अुलैतल्यांलो आंकडो सुमार २१ लक्ष. ताचेपेल्यान दमणगंगेमेरेन कोंकणी अुलैतल्यांलो आंकडो सुमार १६ लक्ष. हे भाशेन, कुल्ली आंकडो सुमार ६२ लक्ष. खरेले कोंकणिची अुत्तर कोंकणीवैली सत्ता अजून मुणूंक ना. पुरावे. पुण मराठिचे 'मुलुखगिरी'तळा अुत्तर कोंकणी भास मरूंक पावल्या. तिका वाटावंक अुपाय करूंक जाय. तुर्ताक खरेले कोंकणिचीच येवजणी केल्यार, ती अुलैतल्यांलो आंकडो २५ लक्ष आसा. देखून तिगेलो खर्च चलोवंक कांयच कठीन ना. काश्मिरी आनी आसामी अुलैतल्यांलो आंकडो आमचेकूय जायतो ल्हान. अुत्तर कोंकणीक मराठिचे भकींतसून सौडेतकूच, आमगेलो आंकडो पावूण कोटिचेर पावतलो.

शेजारी भासांचें वेगळेपण ल्हान-व्हड आंकडो, व्याकरणी बांदावळ आनी अुतरावळ हांचेरूच आधारून आसता अशें न्हय. त्यो भासो राष्ट्रान आनी सरस्पतीन वेगळ्यो आसल्यारूय वेगळ्यो लेखतात. पुरावो. हेय नदरेन, कोंकणी भास मराठी परस सामकीच वेगळी. कोंकणाक स्वतंत्र राष्ट्र ह्या नात्याचो खाशेलो अितिहास आनी संस्कृताय आसा. कोंकणांत कोंकणी शिलाहारांलें स्वराज्य सुमार ५०० वर्सां चलतालें. सास्टींतल्या लोटलेच्या राष्ट्रकुटांलें कोंकणी साम्राज्य विंध्य पर्वतासाकून कांची मेरेन सुमार २२५ वर्सां चलतालें. आजूय सावंतवाडी कोंकण्यांलें सुपुल्लें स्वराज्य चलता. कोंकणाची संस्कृतायूय चड पुर्विल्ली आनी अुंच पांवड्याची. कोंकणांत बुद्ध धर्माची जोत पेटैतलो पुण्ण गोंयच्या सुनापरान्तांत - जांबावली म्हालांत - अडेच हजार वर्सांफाटीं जल्मलो. आर्विल्ल्या काळांत सास्टींत सांकवाळे, पाद्री जुजे वाज हो क्रिस्तांव धर्माचो लंखेचो भाग्यवंत धर्मदूत जालो. बुद्ध धर्माच्या धपक्यांतसून वेद-धर्म वाटांवक हांगा कर्तुतत्वदशेचे हिंदू जावन गेले. परशुरामस्वामी हो तांतूंतलो म्हालगडो. आमगेलें कोंकण म्हळ्यार धर्मदुतांली आनी धर्म-राखण्यांली पवित्र भूंय. हांगाचे लोक धर्मिश्ट आनी न्याय-नितिचे. शेजाऱ्याच्या घरा-दारार 'मुलुखगिरी' करची वज कोंकण्यांक ना. कोंकण देस म्हळ्यार चौदा विद्यांचें आनी चौसट कळांचें कुळार. थैं विद्वान, शूर वीर आनी कर्तुत्वी पुरूश जायते जाले आनी अजून आसात. कोंकण देस म्हळ्यार दूदगंगा. तांतूंतल्या केणांचें आनी नक्षत्रांचें मेज-माप कोण घेत?

अेकल्या कोंकण्या विद्वानांली हिताची बुद्द. हे बुद्दीक लागून आमी आमगेल्या कोंकणांत आयतेकार मानाय जाले. ह्या विद्वानाल्या केस्या-मेम्याक आमी भुरकुटनांत. हे विद्वान म्हळ्यार मराठणाचे बंदे.

आमगेल्या कांय विरोध्यांक पोट-खाणाची पिडा चाळावल्या. पुर्तुगेज सरकारान कोंकणिची चिके अपुर्बाय केल्यार तांगेल्या पोटांत चाबता. गोंयां हिंदू धर्म बुडैलो म्हणटात. सरकाराक वसैच्या झुजाचो अुगडास करून भेश्टायतात. आतांचें झुज पुर्तुगेजांकडेन न्हय, तर आमच्या कोंकण्यांकडेन झुजचें लागतलें. येयात कोण येतात ते आमचेकडेन झुजूंक.

कोंकणीखातीर आनी आमचेखातीर आमी आजवेर कितें केलां आनी करूंक जाय? सुपुल्ल्या भुरग्यांक कोंकणी बदला परक्यो भासो शिकोवन आमी तांगेली मत भंगोवन आयुश्य अुणें करतांत. गोंयां मराठी भाशेन केल्लें भुरग्यांलें लुस्कान. गोंयच्या पसऱ्यांनी 'मोहरी' मेळना. **सांसवां मेळटात.**

कोंकणी भुरग्यांक कोंकणी भाशेन शिकैल्यार सटकरून समज पट्टा हाचो अणभव. पुरावे. हिंदुस्तानांतल्यो आवै-भासो राखून धरपाचें गांधी म्हात्म्यांक अगत्य. निरक्षरी लोकांक अक्षरी करूंक आवै-भाशे सारको अुपाय ना. ज्या राष्ट्रांतल्या सगळ्या लोकांक बरोवंक-वाचूंक आनी हिशेब करूंक येना तें कुड्डें राष्ट्र. रशियाच्या सॉव्हयेट सरकाराची मांडणी. थैं दोंबाऱ्याक लेगीत तागेले आवै-भाशेंत शिकैतात. भुरग्यांली आवै-भास म्हळ्यार संवसारांतल्यो तांगेल्यो जिखो जोडपाचें अेक अुंच शस्त्र. भुरग्याक ल्हानपणांत परके भाशेंत अुलोवंक लावचो हें कसाबपण आनी व्हडलो गुन्यांव. भुरग्यांल्या मुळाव्या शिकपाचीं पुस्तकां आमी कोंकणींत साद्या-सोप्या अुतरांनी रचूंक जायत.

कोंकणिची लिपी. तीन-चार लिपी बऱ्यो न्हयत. अेकूच लिपी थारावंक जाय. जायत्यो लिपी चलूंक दिल्यार कोंकणीक प्रमाण रूप येवचें ना आनी राष्ट्राच्या अेकचाराक नखनामी जातली. लिपी संबंदान आमगेलीं विद्वान मनशां कितें म्हणटात? रोमी लिपीन आमी कोंकणी भास विद्रूप करतांत. देवनगरी वर्णावळ बरी. कोंकणी भास देवनगरी लिपीन शिकोवंक जाय. ती भास रोमी लिपींत बरोवंक आनी वाचूंक चड कश्ट. देवनगरींत चड सोपी. कोंकणिचे जिवणेक रोमी परस देवनगरी चड मानता. देखून हीच लिपी कोंकणी भाशेखातीर थारायल्यार बरी. पांच-धा वर्सांचे अखेरेक आमगेली कोंकणी सरस्पत देवनगरी रंगाचें घमघशीत बरें कापड न्हेशिल्ली दिसूंक अुपाय. देवनगरी लिपीपासून सगळ्यांत व्हडली नफा. क्रिस्तांव भाव देवनगरी शिकतकूच

कोंकणी सोडून मराठिच्या मार्गांत आपशींच पावतले म्हणपाचो आमगेल्या कांय विरोध्यांलो गोड भ्रम !

कोंकणी वाक्यांची बांदावळ. गोंयचे क्रिस्तांव अेवरोपी तरेची बांदावळ चलैतात ती कोंकणीक बरी दिसना.

भाशेचो मान. 'तूं' बदला 'तुमी' म्हणचें. 'अरे' हें अुतर कोशांतूच दवरचें.

प्रमाण कोंकणी. संवसारांतल्यो सगळ्यो भासो अुलोवपांत भौरुपी पुण बरोवपांत अेकरुपी जातात. कोंकणिचीय अशीच गजाल. अुलोवपांतल्या तरांखातीर कोंकणिच्यो आनीक पोट-भासो करची गरज ना. कोंकणी अेकरुपी करूंक आमी वावरूंया. हाका अुपाय.

कोंकणी पुस्तकां रचप. भाशांतरां आनी रुपांतरां परस स्वतंत्र सरस्पत घडची हें बरें. शास्त्रीक पुस्तकांचीं भाशांतरां करचींच पडटलीं. काणयो, नवल-काणयो आनी खेळ हांचीं रुपांतरां करचीं जाल्यार, सामकींच निजाचीं कोंकणी करून सोडचीं. अुतराक अुतर घालून भाशांतर केल्यार अनर्थ जाता.

भाशेंत जड-जडाव. भास जड-जडावाची करची म्हळ्यार भितर पुर्विल्ल्या भासांतलीं अुतरां शिरकटावचीं. हें जायांचें भांगर. हांतूंत सोब ना. अेवरोपी बरप्यांक लातीं आनी ग्रेग अुतरां शिरकटावची खोड. हिंदुस्तानांतल्या लोकांक संस्कृत अुतरां शिरकटावची खोड. बंगाली आनी हिंदी बरप्यांक ही वज. मराठीकूय हें पिशें. गुजराथी भाशेच्या कांठ्यारूय हें भूत. काश्मिरी लोकांलें शाणपण. जायांच्या जड-जडावान विद्येची आनी गिन्यानाची वाड जावंक अडचण. आमी अिंग्रजांली देख घेवंया. तांकां 'लॅटिनिझम'चो वीट. आमी संस्कृत अुतरां गरज नासतना कोंकणींत भरसुंया नाका. कोंकणी भाशेंतल्यो खरेल्यो पंडिता आनी पंडीत.

कोंकणी अुतरावळ. देश्य, तत्सम आनी तद्भव अुतरां. परक्या भासांतलींय कांय अुतरां तद्भव जावन कोंकणी घरांत बसल्यांत. तांतूंतलीं तत्सम अुतरांय कोंकणींत आसात. कांय परकी तद्भवां आमच्यान सोडूंक कठीन. ज्या परकी अुतरांची आमकां गरज ना तीं आमी सोडुंया आनी जांचे बगर अडचतांत तीं राखुंया. कोंकणी भास आमी कशे तरेन फुलोवंया? आमी गावड्यांक पंडीत करुंया आनी सगळेच पंडीत जावंया. कोंकणी भाशेचें पूर्ण स्वराज्य भोगुंया. आमच्यान शास्त्रीक अुतरांय सादीं-सोपीं घडोवं येतीत.

कोंकणी कोठी.

अध्यक्षांलें नांव सुचोवप. **प्रोफेसोर आर्मान्द मिनेझिस, अेम. अे.,**

हांगेली कर्तुत्वदशा आनी तोखणाय. तांकां कोंकणी भाशेचो अभिमान. तांगेली पोट-तिडकेची सांगणी.

अुपकार मानप.

## परिशिश्टां

अ. वर्तमानपत्रां आनी नेमाळीं हांची काळपट्टी वळेरी.

आ. लोटलेचे राष्ट्रकूट.

## अैन वेळार

'गोमन्तक मराठी साहित्य संमेलना'चे तिसरे बसकेचे अध्यक्ष आचार्य काकासायब कालेलकार हांगेल्या अुलोवपांतलो आपरोस.

## कांय अुतरांचो कोंकणी-अिंग्रजी कोश

# आधारावळ आनी संक्षेप


Anglo-Lusitano (O), Bombaim, 20-6-1936.

Ave Maria, Bombaim, 11-1-1942.

Beames. A Comparative Grammar of the Modern Aryan Languages of India : to wit, Hindi, Panjabi, Sindhi, Gujarati, Marathi, Oriya and Bangali by John Beames, vol. 1, London 1872.

Bhandarkar. Wilson Philological Lectures (WPL) on Sanskrit and the Derived Languages delivered in 1877 by Sir R. G. Bhandarkar, K.C.I.E., LL.D., Ph.D., etc., Bombay 1914.

Bombay Chronicle (The), Bombay, 22-1-1942.

Buchanan. A Journey from Madras through the Countries of Mysore, Canara and Malabar by Francis Buchanan, M.D., London 1807, vol. 3.

Camões. Os Lusiadas por Luis de Camões.

Ep. Ind. -- Epigraphia Indica - vol. 7.

Goa Mail (The), Bombay. 2-11-1940.

Goan World (The), Bombay, Christmas 1941.

Grant Duff. A History of the Mahrattas by J. C. Grant Duff, edited by S. M. Edwardes, G.S.I., G.V.O., London 1921, vol. 1.

Grierson, Linguistic Survey of Inda (LSI) compiled and edited by G. A. Grierson, C.I.E., Ph.D., etc.

Vol. 1, pt. 1 Calcutta 1927.
Vol. 1, pt. 2 " 1928.
Vol. 7, " 1905

Harijan, Poona, vol. 8.

Ind. Ant. - Indian Antiquary - vols. 9, 12, 14.

Journal of the Bombay Historical Society, Bombay, vol. 3.

Katre. The Formation of Konkani by S. M. Katre, M.A., Ph.D. (London), Bombay 1942.

King. Changing Man : The Education System of the U.S.S.R., by Beatrice King, London 1936.

Memoir of the Sawunt Waree State by W. Courtney and Major J.W. Auld, Bombay 1855.

Peshwa Daftar, edited by G. S. Sardesai, B.A., vol. 43.

Pinheiro Chagas. Historia de Portugal por Pinheiro Chagas, vol. 3.

Pissurlencar, P.

I. O Elemento Hindu da Casta Chardo, Bastorá, Goa, 1936.
II. Inscrições Pre-Portuguesas de Goa, Bastorá, 1938.

Saldanha. História de Gramática Concani by Mariano Saldanha (Reprinted from the Bulletin of the School of Oriental Studies (University of London), Vol. 8, Parts 2 and 3, 1936.)

Stephens (Estevão). The Christian Puranna of Fr. Thomas Stephens, S.J., edited by J.L. Saldanha, B.A., Mangalore 1907.

Visscher. Letters from Malabar by Jacobus Canter Visscher, Madras 1862.

Xavier. Bosquejo Historico das Communidades Agricolas de Goa, por Filippe Nery Xavier, Bastorá 1907, vol. 2.

अष्टाध्यायी, बरपी पाणिनि.

आबे फारीय - भूलविद्येचो म्हालगडो शास्त्रिक सोदपी आबे फारीय - बरपी शणै गोंयबाब. Vidas, Lições de Vida por Propércia Correia Afonso de Figueiredo. मुंबै १९४२.

ऋग्वेद. मंडळां ८, ९, १०.

कांहीं मराठी लेख, बरपी शणै गोंयबाब, मुंबै १९४५.
केरळ कोकिळ. पु. २, ५.
केसरी, पुणें, २२-१०-१९४०.
कोंकणाख्यान, प्रकाशक हरी भिकाजी सामंत, 'बेळगांव समाचार' छापखाना, शक १८३१.
गाथासप्तशती, बरपी हाल.
जैत - कोंकणी भाशेचें जैत - बरपी शणै गोंयबाब, मुंबै १९३०.
देशी नाममाला, बरपी हेमचंद्र.
नवें गोंय. संपादपी काशीनाथ श्रीधर नायक, मुंबै, वर्स १, २, ३.
निवेदन. लेखक धर्मानंद कोसंबी, मुंबई, १९२४.
पपंचसूदनी, बरपी बुद्धघोष, संपादक धम्मधज, सयामरट्ठस्स राजधानी, बुद्धवर्ष २४६३, स. १९२०.
प्राकृतप्रकाश (प्राप्र.), बरपी वररुचि.
महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, पुणें, १९४१, व. १४.
राम कामती (पुण्यात्मो), बरपी शणै गोंयबाब, मुंबै १९३९.
वसणूक - गोंयकारांची गोंयाभायली वसणूक - बरपी शणै वा. र. वर्दे वालावलीकार, मुंबै १९२८, खंड १.
विविधवृत्त, मुंबै २२-२-१९४२.
विविधज्ञानविस्तार, मुंबै, वर्स ६१.
सरस्वतीमंडल, बरपी रा. भि. गुंजीकार, मुंबै १८८४.
सिद्धहेमशब्दानुशासनम्, बरपी हेमचंद्र.
सेवा-समिती, मडगांव, स. १९४०-४१च्या वृत्तांत.
हरिजनबंधु. पुणें, १७-८-१९४०.

